दादा भगवान प्ररूपित

# जे घडले तोच न्याय

जो निसर्गाचा न्याय आहे, त्यात एका क्षणासाठी सुद्धा अन्याय झालेला नाही.

Marathi

**प्रकाशक** : अजीत सी. पटेल
दादा भगवान विज्ञान फाउंडेशन
1, वरूण अपार्टमेंट, 37, श्रीमाळी सोसायटी,
नवरंगपुरा पुलिस स्टेशनच्या समोर,
नवरंगपुरा, अहमदाबाद - 380009,
Gujarat, India.
**फोन :** +91 79 3500 2100



**प्रथम आवृत्ति** : 1000 सप्टेंबर, 2007
**रीप्रिंट** : 22000 फेब्रुवारी, 2009 ते ऑगस्ट, 2017
**नवी रीप्रिंट** : 5000 एप्रिल, 2022

**भाव मूल्य** : 'परम विनय' आणि
'मी काहीच जाणत नाही', हा भाव!

**द्रव्य मूल्य** : 15 रुपये

**मुद्रक** : अंबा मल्टीप्रिंट
B-99, इलेक्ट्रॉनिक्स GIDC,
क-6 रोड, सेक्टर-25,
गांधीनगर-382044.
Gujarat, India.
**फोन :** +91 79 3500 2142

**ISBN/eISBN** : 978-93-86289-83-4

Printed in India

# त्रिमंत्र





नमो अरिहंताणं

नमो सिद्धाणं

नमो आयरियाणं

नमो ऊवज्झायाणं

नमो लोए सव्वसाहूणं

एसो पंच नमुक्कारो

सव्व पावप्पणासणो

मंगलाणं च सव्वेसिं

पढमं हवइ मंगलं ॥ १ ॥

ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥ २ ॥

ॐ नमः शिवाय ॥ ३ ॥

जय सच्चिदानंद





## दादा भगवान कोण ?

जून 1958 संध्याकाळची अंदाजे सहाची वेळ, सुरत स्टेशनवर अलोट गर्दी होती. रेल्वेच्या प्लेटफॉर्म नंबर तीनच्या बाकावर बसलेल्या श्री अंबालाल मूळजीभाई पटेल रूपी देहमंदिरात नैसर्गिक स्वरूपात कित्येक जन्मांपासून व्यक्त होण्यासाठी आतूर असलेले 'दादा भगवान' संपूर्णपणे प्रकट झाले आणि निसर्गाने सर्जन केले अध्यात्माचे अद्‌भुत आश्चर्य! एका तासात त्यांना विश्वदर्शन लाभले! मी कोण? भगवंत कोण? जग कोण चालवित आहे? कर्म म्हणजे काय? मुक्ती कशाला म्हणतात? इत्यादी जगातील सर्व आध्यात्मिक प्रश्नांची रहस्ये संपूर्णपणे प्रकट झाली.

त्यांना प्राप्ती झाली तशी ते फक्त दोन तासात इतर मुमुक्षूनां सुद्धा आत्मज्ञानाची प्राप्ती करवित असत, त्यांच्या सिद्ध झालेल्या अद्‌भुत ज्ञान प्रयोगाद्वारे! त्याला अक्रम (क्रमविरहीत) मार्ग म्हटले जाते. क्रम म्हणजे पायरी पायरीने, क्रमाक्रमाने वर चढणे! अक्रम म्हणजे लिफ्ट मार्ग! शॉर्ट कट!

ते स्वत: प्रत्येकाला 'दादा भगवान कोण?' याबद्दलची फोड करून देताना म्हणायचे की, "हे दिसतात ते 'दादा भगवान' नाहीत. हे तर 'ए.एम. पटेल' आहेत. आम्ही ज्ञानी पुरुष आहोत आणि आत प्रकट झाले ते दादा भगवान आहेत. दादा भगवान तर 'चौदालोकाचे' नाथ आहेत, ते तुमच्यात पण आहेत, सर्वांमध्ये आहेत! तुमच्यात अव्यक्त रुपात आहेत आणि 'येथे' माझ्या आत संपूर्णपणे व्यक्त झालेले आहेत! मी स्वत: भगवान नाही. माझ्या आत प्रकट झालेले 'दादा भगवान' यांना मी पण नमस्कार करतो."

## आत्मज्ञान प्राप्तीची प्रत्यक्ष लींक

परम पूज्य दादा भगवान (दादाश्री) यांना 1958 मध्ये आत्मज्ञान प्रकट झाले. त्यानंतर 1962 ते 1988 पर्यंत देश-विदेश परिभ्रमण करून मुमुक्षुंना सत्संग आणि आत्मज्ञानाची प्राप्ती करवित असत.

दादाश्रींनी आपल्या हयातीतच आत्मज्ञानी पूज्य डॉ. नीरूबहन अमीन (नीरूमा) यांना आत्मज्ञान प्राप्त करवून देण्याची ज्ञानसिद्धी प्रदान केली होती. दादाश्रींच्या देहविलयानंतर नीरूमा त्यांच्याप्रमाणेच मुमुक्षुंना सत्संग व आत्मज्ञान प्राप्ती निमित्त भावाने करवित असत.

आत्मज्ञानी पूज्य दीपकभाई देसाई यांना सुद्धा दादाश्रींनी सत्संग करण्याची सिद्धी प्रदान केली होती. वर्तमानात पूज्य नीरूमांच्या आशीर्वादाने पूज्य दीपकभाई देश-विदेशात निमित्तभावाने आत्मज्ञान प्राप्ती करवित आहेत.

या आत्मज्ञान प्राप्तीनंतर हजारो मुमुक्षु संसारात राहून, सर्व जबाबदाऱ्या सांभाळत असताना सुद्धा आतून मुक्त राहून आत्मरमणतेचा अनुभव घेत आहेत.

# निवेदन

ज्ञानी पुरुष संपूज्य दादा भगवान यांच्या श्रीमुखातून अध्यात्म आणि व्यवहारज्ञानासंबंधित जी वाणी निघाली, तिला रेकॉर्ड करून संकलन व संपादन करून पुस्तकाच्या रूपाने प्रकाशित केले जात आहे. विभिन्न विषयांवर निघालेल्या सरस्वतीचे अद्भुत संकलन ह्या पुस्तकात झाले आहे, जे नवीन वाचकांसाठी वरदान रूप सिद्ध होईल.

प्रस्तुत अनुवादामध्ये असे विशेष ध्यान ठेवलेले आहे की प्रत्येक वाचकाला दादाश्रींची प्रत्यक्ष वाणीच ऐकली जात आहे असा अनुभव व्हावा. याच कारणाने कदाचित काही ठिकाणी अनुवादाची वाक्य रचना मराठी व्याकरणानुसार त्रुटीपूर्ण जाणवेल, परंतु तिथे जर आशय समजून वाचण्यात आले तर अधिक लाभदायी होईल.

प्रस्तुत पुस्तकात काही ठिकाणी कंसात दर्शविलेले शब्द किंवा वाक्य दादाश्रींद्वारा बोलल्या गेलेल्या वाक्यांना अधिक स्पष्टतापूर्वक समजावण्यासाठी लिहिले गेले आहेत. तसेच काही ठिकाणी इंग्रजी शब्दांना मराठी अर्थाच्या रूपात ठेवले गेले आहेत. दादाश्रींच्या श्रीमुखातून निघालेले काही शब्द जसेच्या तसेच *इटालिक्स* मध्ये ठेवलेले आहेत, कारण त्या शब्दांसाठी मराठी भाषेत असे शब्द नाहीत की जे त्याचा पूर्ण अर्थ देऊ शकतील. तरी पण त्या शब्दांचे समानर्थी शब्द कंसात तसेच पुस्तकाच्या शेवटी पण दिले गेले आहेत.

ज्ञानींच्या वाणीला मराठी भाषेत यथार्थ रूपाने अनुवादित करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु दादाश्रींच्या आत्मज्ञानाचा आशय जसा आहे तसा तर आपल्याला गुजराती भाषेतच अवगत होईल. ज्यांना ज्ञानाचा गहन अर्थ समजून घ्यायचा असेल, ज्ञानाचे खरे मर्म समजायचे असेल त्यांनी ह्या हेतूने गुजराती भाषा शिकावी असा आमचा अनुरोध आहे. अनुवादासंबंधी उणीवांबद्दल आपले क्षमा प्रार्थी आहोत.



# संपादकीय

बद्रीकेदारच्या यात्रेला लाखो लोक गेले आणि अचानक हिमवर्षाव झाला, त्यात शेकडो माणसे दबून मेली. ही बातमी ऐकून हादरुन जातो की, अरेरे! भक्तिभावाने देवाचे दर्शन करायला जाणाऱ्यांनाच देव मारून टाकतो? परमेश्वर खूप अन्यायी आहे! दोन भावांमध्ये मिळकत वाटणीत एक भाऊ सगळे हडप करतो, दुसऱ्याला खूप कमी मिळते तिथे बुद्धी न्याय शोधते, शेवटी कोर्टात जातात आणि सुप्रीम कोर्टापर्यंत लढत राहतात. परिणामी सगळे अधिक दुःखी होतात. निर्दोष व्यक्ती तुरुंगात जातो, गुन्हेगार व्यक्ती मात्र मजा करतो, ह्यात न्याय तो कुठला? नीतीवान माणसे दुःखी होतात, अनीती करणारे बंगला बांधतात आणि गाडीत फिरतात, हे कसले बरे न्यायसंगत असेल?

असे प्रसंग सतत घडतच राहतात, जेथे बुद्धी न्याय शोधत राहते आणि आपण दुःखी होऊन जातो. परम पूज्य दादाश्रींचा हा अद्भुत आध्यात्मिक शोध आहे की ह्या जगात कुठेही अन्याय होतच नाही. जे घडले तोच न्याय! निसर्ग कधी न्यायाच्या बाहेर गेलाच नाही. कारण निसर्ग म्हणजे एखादी व्यक्ती किंवा देव नाही, की ज्यावर कोणाचे वर्चस्व राहील. निसर्ग म्हणजे 'सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्स' (वैज्ञानिक संयोगिक पुरावे). कितीतरी संयोग एकत्र येतात तेव्हा एक कार्य घडते! एवढ्या सगळ्या माणसांमध्ये अमुकच का मारले गेले? ज्यांचा मरण्याचा हिशोब होता त्यांचाच अपघात झाला आणि ते मृत्यूमुखी पडले! एन इन्सिडंट हॅज सॉ मेनी कॉजेस आणि एन ॲक्सिडेन्ट हेज टू मेनी कॉजेस. आपल्या हिशोबाशिवाय एक मच्छरही चावू शकत नाही. हिशोब आहे म्हणूनच दंड येतो. तेव्हा ज्याला ह्यातून सुटायचे आहे, त्याला हीच गोष्ट समजून घ्यायला हवी की आपल्याबरोब जे काही घडले तोच न्याय आहे!

'जे घडले तोच न्याय' ह्या ज्ञानसूत्राचा जीवनात जितका अधिक उपयोग होईल, तितकी शांती लाभेल आणि अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत सुद्धा आत एकही परमाणू हलणार नाही.

**–डॉ. नीरूबहन अमीन**

# जे घडले, तोच न्याय

## विश्वाची विशालता, शब्दातीत...

सर्व शास्त्रांत जितके लिहिले आहे, एवढेच जग नाही. शास्त्रांमध्ये तर अमुकच भागाचे वर्णन आहे. बाकी, जग तर अवक्तव्य आणि अवर्णनीय आहे की जे शब्दांत सांगता येणार नाही, मग तुम्ही शब्दांच्या पलीकडील वर्णन कुठून आणणार? जे शब्दात सामावणार नाही, जे शब्दांच्याही पलीकडचे आहे, त्याचे वर्णन तुम्ही कसे समजणार? हे जग एवढे मोठे, विशाल आहे. आणि ते मी पाहून बसलो आहे. म्हणूनच मी तुम्हाला सांगू शकतो की जग किती विशाल आहे!

## निसर्ग तर सदा न्यायीच

निसर्गाचा जो न्याय आहे, त्यात एक क्षणसुद्धा अन्याय झाला नाही. हा जो निसर्ग आहे, तो एका क्षणासाठी सुद्धा अन्यायी झाला नाही. कोर्टात अन्याय झाले असेल, परंतु निसर्ग कधी अन्यायी होत नाही. निसर्गाचा न्याय कसा आहे की, तुम्ही जर चोख (प्रामाणिक) असाल आणि आज जर तुम्ही चोरी करायला जाल, तर निसर्ग तुम्हाला लगेचच पकडवून देईल आणि मलीन माणूस असेल तर त्याला पहिल्या दिवशी एन्करेज (प्रोत्साहित) करेल. निसर्गाचा असा हिशोब असतो की पहिल्याला चोखच ठेवायचे आहे, म्हणून त्याला पकडवून देतो, मदत करत नाही आणि दुसऱ्याला मदत करतच राहतो. आणि नंतर त्याला असा काही मार मारेल की तो पुन्हा कधीही डोके वर काढणारच नाही. तो पार अधोगतीला जातो, निसर्ग एक क्षणभर सुद्धा अन्याय करत

नाही. लोक मला विचारतात की हे तुमच्या पायाला फ्रेक्चर झाले, ते काय? तर हे सर्व निसर्गाने न्यायच केला आहे.

या निसर्गाच्या न्यायाला जर नीट ओळखाल की, 'घडले तोच न्याय' तर तुम्ही या जगातून मुक्त होऊ शकाल. परंतु जर निसर्गाला जरा सुद्धा अन्यायी समजाल तर मात्र ह्या जगात तुम्ही गुरफटून जाल. निसर्गाला न्यायी मानणे हेच ज्ञान आहे. 'जसे आहे तसे' समजणे, याचे नाव ज्ञान, 'जसे आहे तसे' न समजणे याचे नाव अज्ञान.

एका माणसाने दुसऱ्या माणसाचे घर जाळून टाकले, तर अशा वेळेस कोणी विचारेल की, देवा हे काय? ह्याचे घर ह्या माणसाने जाळले. हा न्याय आहे की अन्याय? तर 'न्याय आहे, जाळले हाच न्याय.' आता तो त्या माणसावर कुढत राहतो की तो नालायक आहे, असा आहे आणि तसा आहे. त्यामुळे मग त्याला अन्यायाचे फळ मिळेल. तो न्यायालाच अन्याय म्हणत आहे! हे जग अगदी न्यायस्वरूपच आहे. एक क्षणभरही त्यात अन्याय होत नाही.

या जगात न्याय शोधू नका. न्याय शोधल्यामुळेच साऱ्या जगात भांडण-तंटे होत आहेत. जग हे न्यायस्वरूपच आहे. म्हणून जगात न्याय शोधूच नका. जे घडले तोच न्याय. जे घडून गेले तोच न्याय. हे कोर्ट वगैरे जे बनलेत, ते न्याय शोधायला निघालात म्हणूनच ना! अरे माणसा! तिथे न्याय होतो का? त्यापेक्षा काय झाले ते पाहा! हाच न्याय आहे.

न्यायस्वरूप वेगळे आहे आणि आपले हे फळस्वरूप वेगळे आहे. न्याय-अन्यायाचे फळ हे सारे हिशोबाने येते आणि आपण आपला न्याय त्याच्याशी जोइंट करायला जातो. म्हणून मग कोर्टातच जावे लागेल ना? आणि तेथे जाऊन थकून भागून परतच यायचे!

तुम्ही एखाद्याला एक शिवी दिली तर मग तो तुम्हाला दोन-तीन शिव्या देणार, कारण त्याचे मन आपल्यावर वरील रागाने धुमसत असते.

आता यावर लोक काय म्हणतील? त्याने तीन शिव्या का दिल्या? ह्याने तर एकच शिवी दिली होती. तर ह्यात न्याय काय आहे? न्याय हाच की त्याने आपल्याला तीनच शिव्या द्याव्यात, असा हिशोबच होता. तो मागचा हिशोब वसूल करणार की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो, करणार.

**दादाश्री :** वसुली करतात की नाही करत? तुम्ही त्याच्या वडीलांना पैसे उधार दिले असतील, पण मग संधी मिळताच तुम्ही ते वसूल करून घेता ना! पण त्याला तर असेच वाटेल की तुम्ही अन्याय करत आहात. तसाच हा निसर्गाचा न्याय आहे, की जो मागचा हिशोब असेल तो सर्व एकत्र जोडून समोर आणतो. आज पतीला त्याची पत्नी त्रास देत असेल, तो निसर्गाचा न्यायच आहे. पतीला वाटते की ही पत्नी खूप वाईट आहे, आणि पत्नीला वाटते की पती वाईट आहे. परंतु हा निसर्गाचा न्यायच आहे.

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** आणि मग तुम्ही जेव्हा तक्रार करायला येता तेव्हा मी ती तक्रार ऐकत नाही, त्याचे कारण काय?

**प्रश्नकर्ता :** आता लक्षात आले की, हा न्याय आहे.

## गुंता सोडवतो निसर्ग

**दादाश्री :** हा सर्व आमचा शोध आहे! 'भोगतो त्याची चूक' पाहा बरे, किती चांगला शोध आहे! कुणाशीही संघर्षात (वादविवादात) पडू नकोस आणि व्यवहारात न्याय शोधू नकोस.

नियम कसा आहे की ज्या प्रकारे गुंता केला असेल, त्या प्रकारेच तो गुंता सुटत जातो. अन्यायपूर्वक गुंता केला असेल तर तो अन्यायाने सुटतो आणि न्यायाने केला असेल तर न्यायाने सोडवला जातो. खरे तर सारा गुंता अशा प्रकारेच सोडवला जातो, आणि लोक त्यात न्याय शोधत

बसतात. अरे बाबा! कोर्टाप्रमाणे न्याय कसला शोधतोस! अन्यायपूर्वक गुंता तू केलास आणि आता तो तू न्यायपूर्वक सोडवू पाहतोस. असे कसे होईल? हे तर असे आहे की नऊने गुणलेले त्यास नऊने भागले म्हणजे आपण मूळ ठिकाणीच पोहोचू ना! असे कितीतरी गुंते गुंतून पडले आहेत. म्हणून माझे हे शब्द ज्याने अंगीकारले आहेत त्याचे तर कामच होऊन जाईल ना!

**प्रश्नकर्ता :** हो दादा, हे दोन-तीन शब्द पकडले असतील, आणि जिज्ञासू माणूस असेल, त्याचे तर (मोक्षाचे) कामच होऊन जाईल.

**दादाश्री :** हो काम होऊन जाईल, जास्त शहाणपणा केला नाही तर काम सहजपणे होईल.

**प्रश्नकर्ता :** व्यवहारात 'तू न्याय शोधू नकोस' आणि 'भोगतो त्याची चूक', ही दोन सूत्रे पकडली आहेत.

**दादाश्री :** न्याय शोधू नकोस, हे वाक्य जर पकडून ठेवले तर त्याचे सर्व व्यवस्थित होईल. हा न्याय शोधतो आहे, म्हणूनच ही सर्व गुंतागुंत निर्माण होत असते.

## पुण्योदयाने खुनी पण सुटतो निर्दोष...

**प्रश्नकर्ता :** समजा कोणी कोणाचा खून केला, तर त्यालाही न्यायच म्हणायचे का?

**दादाश्री :** न्यायाबाहेर तर काहीच होत नाही. याला न्यायच म्हटले जाते, परमेश्वराच्या भाषेत. सरकारी भाषेत असे म्हणता येणार नाही, लोकभाषेत असे म्हणता येणार नाही. लोकभाषेत तर खून करणाऱ्याला पकडून आणतील, व त्याला गुन्हेगार ठरवतील. आणि परमेश्वराच्या भाषेत काय म्हणतील? तर 'ज्याचा खून झाला तोच गुन्हेगार आहे.' आपण विचारले की, हा खून करणाऱ्याचा गुन्हा नाही का? तर नाही, खून करणारा जेव्हा पकडला जाईल, तेव्हा तो गुन्हेगार म्हटला

जाईल. आता तर तो पकडला गेला नाही आणि हा पकडला गेला! तुमच्या लक्षात येते ना, मी काय म्हणतो ते?

**प्रश्नकर्ता :** कोर्टात एखादा माणूस खून करून निर्दोष सुटतो, तो त्याच्या पुण्यामुळे सुटतो की तो त्याच्या पूर्वकर्माचा बदला घेत आहे म्हणून सुटतो. याचा खुलासा करा ना दादा.

**दादाश्री :** पुण्य, आणि पूर्वकर्माचा बदला घेणे, हे सर्व एकच आहे. त्याच्या पुण्याईने सुटला आणि दुसरा कोणी काही गुन्हा केला नसेल तरीही पकडला जाईल, त्याला मग जेलमध्ये जावे लागेल. हा सर्व त्याच्या पापाचा उदय. म्हणून भोगल्याशिवाय गत्यंतरच नाही.

बाकी, जगाच्या कोर्टात कदाचित कधीतरी अन्याय होऊ शकतो, परंतु निसर्गाने ह्या जगात कधीही अन्याय केला नाही, नेहमी न्यायातच असतो. न्यायाच्या बाहेर निसर्ग कधीही गेलेला नाही. मग वादळ कधी दोनदा येईल किंवा एकदा येईल, परंतु ते सर्व न्यायानुसारच होत असते.

**प्रश्नकर्ता :** आपल्या दृष्टीने, विनाश होताना जी दृश्ये दिसतात, ती आपल्यासाठी श्रेयस्कर असतात ना?

**दादाश्री :** विनाश होताना दिसते त्याला श्रेयस्कर कसे म्हणता येईल? पण विनाश होतो ते निसर्ग नियमानुसार सत्यच आहे. निसर्ग जिथे विनाश करतो, तेही बरोबर आहे आणि निसर्ग ज्याचे पोषण करतो, तेही बरोबर आहे. सर्व रेग्युलर करत असतो, ऑन द स्टेज! लोक तर स्वतःच्या स्वार्थामुळे ओरडत असतात की, 'माझे कापसाचे पीक जळाले' तेव्हा छोटे शेतकरी म्हणतात, 'आमच्यासाठी फायदेशीर झाले' अर्थात लोक तर आपापल्या स्वार्थाचीच गाणी गातात.

**प्रश्नकर्ता :** आपण म्हणता की निसर्ग न्यायी आहे, तर मग भूकंप होतो, वादळ येते, अतिवृष्टि होते, ते का बरे?

**दादाश्री :** हा सर्व न्यायच होत आहे. पाऊस पडतो, धान्य पिकते, हेही न्यायच होत आहे आणि भूकंप होतो, तेही न्यायच होत आहे.

**प्रश्नकर्ता :** ते कसे काय?

**दादाश्री :** जेवढे गुन्हेगार आहेत तेवढेच पकडले जातात, इतर कोणी नाही. निसर्ग फक्त गुन्हेगाराला पकडतो! हे जग किंचितमात्र डिस्टर्ब झालेले नाही. एक सेकन्डही न्यायाच्याबाहेर गेलेले नाही.

## जगात गरज आहे चोरांची आणि सापांचीही

लोक मला विचारतात, हे चोर का बरे आले असतील? ह्या साऱ्या खिसेकांपूची काय आवश्यकता आहे? परमेश्वराने त्यांना का बरे जन्माला घातले असेल? अरे! ते नसतील तर तुमचे खिसे रिकामे कोण करणार? परमेश्वर स्वतः येईल का? तुमचे चोरीचे धन कोण घेऊन जाणार? तुमचा काळा पैसा कोण घेऊन जाणार? हे बिचारे तर फक्त निमित्त आहेत. म्हणजे ह्या सर्वांचीही आवश्यकता आहे.

**प्रश्नकर्ता :** कोणाची घामाची कमाई पण निघून जाते.

**दादाश्री :** ही तर ह्या जन्माची घामाची कमाई आहे, पण मागचा सर्व हिशोब बाकी आहे ना! वहीखाते बाकी आहे म्हणून, नाहीतर कोणीही आपले काहीही घेऊ शकत नाही! घेऊ शकेल अशी कोणाची शक्तीच नाही आणि घेऊन जाणे हा तर मागच्या कित्येक जन्माचा हिशोब आहे. ह्या जगात असा कोणी जन्मला नाही की जो कोणाला काही करू शकेल. इतके नियमबद्ध हे जग आहे. खूपच नियमबद्ध चालणारे जग आहे. साप पण शिवणार नाही. एवढे मोठे शिवार सापांनी भरलेले असेल, पण साप आपल्याला शिवतसुद्धा नाही. असे नियमबद्ध जग आहे. खूप हिशोबपूर्ण आहे. हे जग खूप सुंदर आहे. न्यायस्वरूप आहे, पण लोकांना हे समजत नाही.

## परिणामावरून कारण कळते

हा सारा रिजल्ट (परिणाम) आला आहे. जसा परीक्षेचा रिजल्ट लागतो ना, या गणितात शंभर पैकी पंच्याण्णव गुण मिळाले आणि इंग्रजीत शंभर पैकी पंचवीस गुण मिळाले. तर काय आपल्या लक्षात येत नाही की, आपली कुठे चूक झाली? ह्या परिणामावरून, कोणत्या कोणत्या कारणाने चुका झाल्या ते आपल्याला समजते ना? हे जे सर्व संयोग एकत्र होतात, ते सारे परिणाम आहेत. आणि त्या परिणामावरून, कारण काय होते तेही आपल्याला कळते.

इथे रस्त्यात सर्व माणसे येत-जात असतात आणि रस्त्यातच बाभळीच्या काट्याची मोळी पडलेली असते. रस्त्यातून इतके लोक येत-जात असतात पण ती मोळी तशीच पडलेली असते. आपण कधीही बूट, चप्पल घातल्याशिवाय निघत नाही. परंतु त्या दिवशी कोणाकडे गेलो असताना तेथे आरडाओरडा होतो की 'चोर आला, चोर आला', तेव्हा आपण अनवाणी पायाने पळतो तर तो काटा आपल्या पायात घुसतो, तर तो आपला हिशोब! काटा अगदी आरपार निघून जातो, इतका लागतो! आता हे संयोग कोणी बरे एकत्र करून आणले? तर हे 'व्यवस्थित शक्ती' एकत्र करते. (व्यवस्थित शक्ती=वैज्ञानिक संयोगिक पुरावे एकत्र होऊन आलेला परिणाम.)

## निसर्गाचे कायदे

मुंबईच्या फोर्ट परिसरात तुमचे सोन्याचा साखळी असलेले घड्याळ हरवले, तर घरी आल्यानंतर तुम्ही अशी आशा ठेवणार नाही की ते घड्याळ पुन्हा तुमच्या हातात येईल. परंतु दोन दिवसानंतर पेपरात जाहिरात येते की, ज्याचे घड्याळ हरवले असेल, त्याने त्या बद्दलचा पुरावा दाखवून ते घेऊन जावे आणि जाहिरातीचा खर्च मात्र द्यावा. म्हणजेच ज्याचे आहे त्याचे कोणी घेऊ शकणार नाही. ज्याचे नाही त्याला ते मिळणार नाही. त्यात तसूभर सुद्धा कोणी पुढे-मागे करू शकणार नाही. इतके नियमबद्ध

आहे हे जग. कोर्ट कसेही असो, पण ते कोर्ट कलियुगाच्या रीतिनुसारच असणार! परंतु हा निसर्ग नियमाधीन आहे. कोर्टाचे कायदे मोडले असतील तर कोर्टाचे गुन्हेगार ठराल, पण निसर्गाचे कायदे तोडू नका.

## हे तर आहे स्वतःचेच प्रोजेक्शन

हे सारे प्रोजेक्शन (प्रयोजन) तुमचेच आहे. लोकांना का बरे दोष द्यायचा?

**प्रश्नकर्ता :** क्रियेची प्रतिक्रिया आहे का ही?

**दादाश्री :** याला प्रतिक्रिया असे म्हणता येणार नाही. पण हे सारे प्रोजेक्शन तुमचे आहे. प्रतिक्रिया म्हणाल तर मग ॲक्शन एन्ड रिॲक्शन आर इक्वल एन्ड अपॉजिट (क्रिया आणि प्रतिक्रिया समान आणि विरुद्ध दिशेच्या असतात).

हे तर एक उदाहरण दिले. तुमचेच प्रोजेक्शन आहे हे. ह्यात दुसऱ्या कोणाचा हात नाही. म्हणून तुम्ही सावध राहिले पाहिजे की ही सर्व जबाबदारी माझीच आहे. जबाबदारी समजल्यावर घरातील आपले वर्तन कसे असावे?

**प्रश्नकर्ता :** त्याप्रमाणे वर्तन करायला हवे.

**दादाश्री :** हो. स्वतःची जबाबदारी समजायला हवी. नाहीतर म्हणाल की भगवंताची भक्ती केल्याने हे सारे गुन्हे धुतले जातील. हे सारे थोतांड आहे! भगवंताच्या नावानेच घोटाळे केले लोकांनी! जबाबदारी स्वतःची आहे. सर्वस्वी स्वतःच जबाबदार, स्वतःचेच प्रोजेक्शनच आहे ना?

कोणी दुःख दिले तर जमा करून घ्यावे. पूर्वी तू जे दिले असेल तेच परत आले, असे समजून जमा करायचे आहे. कारण इथे विनाकारण कुणी कुणाला दुःख देऊ शकेल, असा कायदाच नाही. त्याच्यामागे कारणे असलीच पाहिजेत, म्हणून जमा करून घ्यावे.

## संसार चक्रातून सुटायचे आहे, त्याला

मग कधी वरणात मीठ जास्त झाले तर तोही न्याय!

**प्रश्नकर्ता :** काय होत आहे ते पाहायचे, असे तुम्ही म्हणता, तेव्हा मग न्याय करण्याचा प्रश्नच कुठे येतो?

**दादाश्री :** न्याय, मी जरा वेगळेच सांगू इच्छितो. पाहा ना, त्याचा हात थोडा रॉकेलतेलाचा असेल, आणि त्याच हाताने तांब्या पकडला, त्यामुळे तांब्याला रॉकेलचा वास लागला. आता मी सहज पाणी प्यायला गेलो, तर मला रॉकेलचा वास आला. तेव्हा आम्ही 'पाहतो आणि जाणतो' की काय घडले! मग न्याय कसा पाहायला हवा की, कधी नाही आणि आज आपल्या वाट्याला हे कुठून आले? म्हणून हा आपलाच हिशोब आहे, तेव्हा आता हा हिशोब पूर्ण करून टाका. परंतु हे कोणाला कळणार नाही अशा रीतिने तो पूर्ण करून टाकावा. मग सकाळी उठल्यानंतर, त्या ताईनी येऊन परत तेथूनच पाणी मागवून आम्हाला दिले, तरी आम्ही ते पिऊन टाकतो, कोणालाही कळू न देता. आता अज्ञानी ह्या ठिकाणी काय करेल?

**प्रश्नकर्ता :** आरडाओरडा करून टाकेल.

**दादाश्री :** घरातील सर्व माणसांना कळेल की ओहोहो! आज शेठजींच्या पाण्यात रॉकेल पडले!

**प्रश्नकर्ता :** सगळे घर हादरुन जाईल.

**दादाश्री :** अरे, सगळ्यांना वेडे करून टाकेल! आणि बायको तर बिचारी चहात साखर टाकायचेही विसरुन जाते. एकदा मन विचलित झाले तर दुसरे काय होणार? इतर सर्व बाबतीतसुद्धा विचलित होईल.

**प्रश्नकर्ता :** दादा, अशावेळी आम्ही तक्रार करू नये हे बरोबर, पण मग शांतपणे घरच्यांना सांगू तर शकतो ना की, पाण्यात रॉकेल मिसळले होते. आता या पुढे लक्ष ठेवा.

**दादाश्री :** हे केव्हा सांगता येईल? चहा-नाश्ता चालला असेल, सगळे हसत असतील, तेव्हा हासत हासत सांगू शकतो.

जशी आम्ही ही गोष्ट उघड केली ना? असेच हसत-खेळत असताना ती गोष्ट उघड करून टाकावी.

**प्रश्नकर्ता :** म्हणजेच समोरच्या व्यक्तीला टोचणार नाही अशा प्रकारे सांगायचे ना?

**दादाश्री :** होय, अशा प्रकारे सांगितले तर ते समोरच्या व्यक्तीला उपयोगी ठरेल. पण सगळ्यात चांगला मार्ग हाच की 'मेरी भी चूप अन् तेरी भी चूप!!!' यासारखे दुसरे काहीच नाही. कारण ज्याला या संसारातून सुटका करून घ्यायची आहे, तो जरा सुद्धा आरडाओरडा करणार नाही.

**प्रश्नकर्ता :** सल्ला देण्याच्या दृष्टीनेही कुणाला काही सांगू नये? तेथे पण चूप राहायचे का?

**दादाश्री :** तो त्याचा सगळा हिशोब घेऊनच आला आहे. समंजस होण्यासाठी पण तो सारा हिशोब घेऊनच आलेला आहे.

आम्ही काय सांगतो की ह्या संसारतून सुटायचे असेल तर पळून जा. आणि पळायचे असेल तर काही बोलू नकोस. जर रात्री पळून जायचे असेल आणि आपणच आरडाओरडा करत राहिलो तर मग आपण पकडले जाऊ ना!

## परमेश्वराकडे कसे असते?

परमेश्वर न्यायस्वरूपही नाही आणि अन्यायस्वरूपही नाही. कोणाला दु:ख न होवो, हीच परमेश्वराची भाषा आहे. न्याय-अन्याय ही तर लोकभाषा आहे.

चोर, चोरी करण्यात धर्म समजतो, दानेश्वर, दान देण्यात धर्म समजतो, ही लोकभाषा आहे, परमेश्वराची भाषा नाही. परमेश्वराकडे असे

काहीच नाही. परमेश्वराकडे तर एवढेच आहे की, 'कोणत्याही जीवाला दु:ख न होवो, हीच आमची आज्ञा आहे!'

न्याय-अन्याय तर निसर्गच पाहतो. बाकी, ह्या जगाचा न्याय-अन्याय तर शत्रूला, गुन्हेगाराला मदत करतो. म्हणतील, 'अहो, जाऊ द्या ना बिचाऱ्याला!' मग तो गुन्हेगारही सुटून जातो. 'असेच असते.' असेही म्हणतील. बाकी, निसर्गाच्या न्यायासमोर तर सुटकाच नाही. तिथे कोणाचेच चालत नाही!

## स्वदोष दाखवतो अन्याय

फक्त स्वत:च्या दोषामुळे सर्व जग बेकायदेशीर (अन्यायकारक) वाटते. जग बेकायदेशीर कोणत्याही क्षणी नसते. पूर्णपणे न्यायसंगतच असते. इथल्या कोर्टाच्या न्यायात फरक पडू शकतो. तो खोटा ठरु शकतो, पण ह्या निसर्गाच्या न्यायात फरक होत नाही.

**प्रश्नकर्ता :** कोर्टाचा न्याय हा निसर्गाचा न्याय, असे नाही का?

**दादाश्री :** हे सारे नैसर्गिकच आहे. परंतु कोर्टात आपल्याला असे वाटते की ह्या जज्जने असे केले. तसे निसर्गाच्या बाबतीत वाटत नाही ना! पण ही तर बुद्धीची ढवळाढवळ आहे!

**प्रश्नकर्ता :** तुम्ही निसर्गाच्या न्यायाला कंप्युटरबरोबर तुलना केली पण कंप्युटर तर मेकॅनिकल (यंत्रवत्) असते?

**दादाश्री :** समजविण्यासाठी त्याच्यासारखे दुसरे कोणते साधन नाही ना, म्हणून मी हे उदाहरण दिले. बाकी कंप्युटरचे उदाहरण तर फक्त हेच सांगण्यासाठी आहे की, कंप्युटरमध्ये जसे फीड केले जाते, तसेच ह्यात आपला भाव भरला जातो. म्हणजे एका जन्मात भावकर्म फीड फीड झाल्यानंतर, दुसऱ्या जन्मात त्याचा परिणाम दिसून येतो. तेव्हा त्याचे विसर्जन होते. आणि ते ह्या 'व्यवस्थित शक्तीच्या' हातात आहे. जे एक्झॅक्ट न्यायच करते. जे न्यायपूर्ण असेल तेच करते. बाप

आपल्या मुलाला मारून टाकतो, असे सुद्धा न्यायात येते. तरीसुद्धा त्याला न्यायच म्हणतात. निसर्गाच्या न्यायाला तर न्यायच म्हणतात. कारण जसा बाप आणि मुलाचा हिशोब होता, तोच हिशोब चुकता झाला. परतफेड पूर्ण झाली. या सर्व बाबतीत फक्त हिशोब फेडले जातात, दुसरे काहीही घडत नाही.

एखाद्या गरीब माणसाला लॉटरीत एक लाख रुपये मिळतात, तोही न्याय आहे, आणि कोणाचा खिसा कापला गेला तर तो सुद्धा न्यायच आहे.

## निसर्गाच्या न्यायाला आधार काय?

**प्रश्नकर्ता :** निसर्ग न्यायी आहे, त्याला आधार काय? न्यायी म्हणण्यासाठी काही आधारभूत गोष्ट तर पाहिजे ना?

**दादाश्री :** निसर्ग न्यायी आहे, ते तर तुम्हाला समजण्यापुरतेच आहे. तुम्हाला विश्वास बसेल की न्यायी आहे. परंतु बाहेरच्या लोकांना (अज्ञानतेमुळे) निसर्ग न्यायी आहे, असा विश्वास कधी बसणारच नाही. कारण त्यांना तशी दृष्टी नाही ना! (कारण ज्याला आत्मज्ञान प्राप्ती झालेली नाही त्याची दृष्टी सम्यक् नाही.)

बाकी, आम्ही काय सांगू इच्छितो? आफ्टर ऑल (शेवटी), जग काय आहे? अरे भाऊ, हे असेच आहे. एका अणूचाही फरक होणार नाही, एवढे हे न्यायस्वरूप आहे, निव्वळ न्यायी आहे.

निसर्ग दोन वस्तूंनी बनलेले आहे. एक स्थायी सनातन वस्तू आणि दुसरी अस्थायी वस्तू. जी अवस्था स्वरूपाने आहे. त्याची अवस्था बदलत राहते आणि ती नियमानुसारच बदलत राहते. पाहणारा माणूस स्वतःच्या एकांतिक बुद्धीने पाहतो. अनेकांत बुद्धीने कोणी विचार करीत नाही, पण स्वतःच्या स्वार्थ बुद्धीनेच पाहत असतो.

कोणाचा एकुलता एक मुलगा मेला, तरी तो न्यायच आहे. त्यात कोणी अन्याय केलेला नाही. यात परमेश्वराचे किंवा कोणाचेही अन्याय

नाही. हा न्यायच आहे! म्हणून आम्ही म्हणतो की हे जग न्यायस्वरूप आहे. निरंतर न्यायस्वरूपातच आहे.

कोणाचा एकुलता एक मुलगा गेला, तर त्याच्या घरातीलच माणसेच रडतात. दुसरी आजुबाजूची माणसे का रडत नाहीत? घरातील माणसे स्वतःच्या स्वार्थामुळे रडतात. जर सनातन तत्त्वात (स्वतःच्या आत्मस्वरूपात) आलात, तर निसर्ग न्यायपूर्णच दिसेल.

ताळमेळ बसतो आहे का ह्या सर्व गोष्टींचा? ताळमेळ बसला तर समजावे की हे बरोबर आहे. जर ज्ञानदृष्टीने पाहिले तर कितीतरी दुःख कमी होईल!

आणि एका क्षणासाठीही न्यायात बदल होत नाही. जर अन्यायी असते तर कोणी मोक्षाला गेलेच नसते. कोणी म्हणेल चांगल्या माणसांना अडचणी का येतात? पण इतर कोणीही अशी अडचण उभी करू शकत नाही. कारण आपण स्वतः जर कोठेही हस्तक्षेप केला नाही, तर कोणाची हिंमत नाही की आपले काही वाईट करेल. आपण स्वतःच हस्तक्षेप केला होता, म्हणून हे सारे उभे राहिले आहे.

## प्रॅक्टिकल पाहिजे, थियरी नाही

आता शास्त्रकार काय लिहितात? 'जे घडले तोच न्याय' असे ते म्हणणार नाहीत. ते तर (लौकिक) 'न्याय हाच न्याय' असे म्हणतात. अरे बाबा, तुझ्यामुळे तर आम्ही भटकत आहोत. अर्थात थिऑरिटिकली असे म्हणतात की, न्याय हाच न्याय, याउलट प्रॅक्टिकल काय सांगते की, 'जे घडले तोच न्याय.' प्रॅक्टिकलशिवाय या जगात कोणतेच काम होत नाही. म्हणून हे थिऑरिटिकल टिकले नाही.

तात्पर्य, जे घडले तोच न्याय. निर्विकल्पी व्हायचे असेल तर, 'जे घडले तोच न्याय.' आणि विकल्पी व्हायचे असेल तर न्याय शोधा. परमात्मा व्हायचे असेल तर जे घडले तोच न्याय आणि जर भटकत राहायचे असेल, तर न्याय शोधत राहून निरंतर भटकतच राहा.

## लोभींना बोचते नुकसान

हे जग खोटे नाही. जग न्यायस्वरूप आहे. निसर्गाने कधीही अन्याय केलेला नाही, अजिबात नाही. निसर्ग माणसाला कापून टाकतो, अपघात होतो, हे सारे न्यायस्वरूप आहे. न्यायाबाहेर निसर्ग जात नाही. विनाकारण अज्ञानतेमुळे लोक काहीही बोलत राहतात. जीवन जगण्याची कलाही अवगत नाही. नुसती चिंताच चिंता... म्हणूनच जे घडते, त्यास न्याय म्हणा.

तुम्ही दुकानदाराला शंभराची नोट दिली. पाच रुपयाचे त्याने तुम्हाला सामान दिले. आणि पाच रुपये परत केले. गडबडीत तो नव्वद रुपये द्यायचे विसरुन गेला, आता त्याच्याकडे कितीतरी न मोजल्या गेलेल्या शंभराच्या नोटा, दहाच्या नोटा असतात, समजा तो विसरुन गेला आणि त्याने तुम्हाला पाचच रुपये परत केले, तर तुम्ही काय म्हणाल? 'मी तुला शंभराची नोट दिली होती', तेव्हा तो म्हणेल, 'नाही.' कारण त्याच्या लक्षात तेच आहे. तोही खोटे बोलत नाही. तर अशावेळी आपण काय करायला हवे?

**प्रश्नकर्ता :** पण ती गोष्ट सारखी बोचतच राहते की इतके पैसे गेले. मन आरडाओरडा करते.

**दादाश्री :** ते बोचत राहते तर ज्याला बोचते, त्याला झोप लागणार नाही. 'आपल्याला' (शुद्धात्म्याला) काय? ह्या शरीरात ज्याला बोचत आहे त्याला झोप लागणार नाही. पण सगळ्यांनाच बोचेल असेही नाही. लोभ्याला मात्र बोचेल! तेव्हा त्या लोभ्याला सांगावे, 'बोचत आहे? तर झोपून जा ना! आता तर संपूर्ण रात्र झोपावेच लागेल!'

**प्रश्नकर्ता :** त्याची तर झोप पण जाईल आणि पैसे पण जातील.

**दादाश्री :** हो, म्हणजे तेथे जर 'जे घडले ते खरे' हे ज्ञान हजर राहिले, तर आपले कल्याणच झाले.

'जे घडले तोच न्याय,' हे जर समजले तर संपूर्ण संसार सागर पार होईल. ह्या जगात एक सेकन्ड पण अन्याय होत नाही, न्यायच होत राहिला आहे. पण बुद्धी आपल्याला फसविते की याला न्याय कसे म्हणता येईल? म्हणून आम्ही मूळ गोष्ट सांगू इच्छितो की हा निसर्गाचे न्याय आहे, आणि बुद्धीपासून तुम्ही वेगळे होऊन जा. यात बुद्धी आपल्याला फसविते. एकदा नीट समजून घेतल्यानंतर बुद्धीचे आपण ऐकायचे नाही. जे घडले तोच न्याय. कोर्टाच्या न्यायात चुकभूल होऊ शकते. उलट-सुलट होऊ शकते, परंतु ह्या न्यायात फरक होत नाही.

## कमी-जास्त वाटणी, हाच न्याय

एक भाऊ आहे, त्याचे वडील वारले म्हणून सर्व भावंडाची जी जमीन होती, ती त्या मोठ्या भावाच्या ताब्यात गेली. आता तो मोठा भाऊ लहान भावांना धमकावत राहतो व त्यांना त्यांच्या वाट्याची जमीन देत नाही. जमीन अडीचशे बीघा होती. त्या चौघांना पन्नास-पन्नास बीघा जमीन द्यायची होती. पण कोणी पंचवीस घेऊन गेला, कोणी पन्नास घेऊन गेला, कोणी चाळीस घेऊन गेला आणि कोणाला पाचच बीघा जमीन मिळाली.

अशा वेळी काय समजायचे? जगाचा न्याय काय म्हणतो, मोठा भाऊ खोटारडा आहे, वाईट आहे. निसर्गाचा न्याय काय म्हणतो? मोठ्या भावाचे बरोबर आहे. पन्नासवाल्याला पन्नास दिले, पंचवीसवाल्याला पंचवीस, चाळीसवाल्याला चाळीस आणि पाचवाल्याला पाचच बीघा जमीन दिली. आणि बाकीची गेली मागच्या जन्माचा हिशोब चुकता करण्यात. माझी गोष्ट समजते का तुम्हाला?

म्हणजे भांडण करायचे नसेल तर निसर्गाच्या नियमाप्रमाणे चालावे, नाहीतर हे जग भांडणच आहे. येथे न्याय असू शकत नाही. न्याय तर हे पाहण्यासाठी आहे की, माझ्यात काही परिवर्तन, काही फरक झाला आहे का? जर मला न्याय मिळत असेल, तर मी न्यायी आहे, ही गोष्ट

निश्चित झाली. न्याय तर आपले एक थर्मामीटर आहे. बाकी, व्यवहारात न्याय असू शकत नाही ना! न्यायात आला म्हणजे माणूस परिपूर्ण झाला. तोपर्यंत तो अबॉव नॉर्मल असतो किंवा बिलो नॉर्मल असतो.

म्हणजे तो मोठा भाऊ धाकट्या भावाला पूर्ण वाटा देत नाही, त्याला पाच बीघाच जमीन देतो, त्यात आपले लोक न्याय शोधत बसतात आणि मोठ्या भावाला वाईट ठरवितात. तर हा सर्व गुन्हाच आहे. तू भ्रांतीत सापडला आहेस आणि त्या भ्रांतीलाच तू खरे मानतोस. यातून मग सुटकाच नाही, भ्रांतीला खरे मानले, म्हणून ह्या व्यवहारालाच खरे मानले, तेव्हा मार तर पडणारच ना! बाकी, निसर्गाच्या न्यायात काहीही चुकभूल नसतेच.

आता तिथे आम्ही असे सांगणार नाही की, 'तुम्ही असे करू नका, यांनी एवढे करायचे.' असे सांगितले तर आम्ही वीतराग म्हटले जाणार नाही. आम्ही तर हेच पाहात राहतो की मागचा काय हिशोब आहे!

आता जर कुणी आम्हाला सांगितले की तुम्ही न्याय करा. न्याय करण्यास सांगितले, तर आम्ही म्हणू की भाऊ, आमचा न्याय वेगळ्या प्रकारचा आहे आणि या जगाचा न्याय वेगळ्या प्रकारचा आहे. जगाचे रेग्युलेटर आहे ना, ते त्याला रेग्युलेशन (नियमन)मध्येच ठेवतो. एक क्षणसुद्धा अन्याय होत नाही. पण तरी लोकांना अन्याय का बरे वाटतो? तेथे मग तो न्याय शोधतो. अरे भाऊ, जे दिले गेले तोच न्याय. का तुला दोन दिले नाही आणि पाच दिले? जे दिले गेले, तोच न्याय आहे, कारण हा सर्व एकमेकांचा पूर्वीचा हिशोब आहे, सारा गुंताच आहे. न्याय हे तर थर्मामीटर आहे. त्या थर्मामीटरने पाहून घ्यायचे की 'पूर्वी मी न्याय केला नव्हता, म्हणून आज माझ्यावर अन्याय झाला आहे. म्हणजेच थर्मामीटरचा दोष नाही. तुम्हाला कसे वाटते? माझी ही गोष्ट तुम्हाला काही मदत करेल का?

**प्रश्नकर्ता :** पुष्कळ मदत करेल.

**दादाश्री :** जगात न्याय शोधू नका. जे होत आहे, तोच न्याय. आपण पाहायचे की हे काय होत आहे. 'पन्नास बीघाच्या ऐवजी पाचच बीघा देत आहे.' तर भावाला म्हणावे, 'बरोबर आहे, आता तू खुश आहेस ना?' तेव्हा तो म्हणेल 'हो.' मग दुसऱ्या दिवसापासून एकत्र जेवायला बसायचे, सोबत हिंडायचे-फिरायचे. हा हिशोब आहे. हिशोबाबाहेर तर कोणीच नाही. हिशोब घेतल्याशिवाय बाप मुलांना सोडत नाही. हा तर निव्वळ हिशोबच आहे, नाते नाही. तुम्ही तर नाते समजून बसला होता.

## चिरडून मारले, हाही न्याय

एक माणूस बसमध्ये चढण्यासाठी, रस्त्याच्या उजव्या बाजूला खाली उभा होता. चुकीच्या बाजूने एक बस आली, ती थेट त्याच्या अंगावरुन गेली आणि त्याला मारले. ह्याला काय न्याय म्हणता येईल?

**प्रश्नकर्ता :** ड्रायव्हरने चिरडून मारले, लोक तर असेच म्हणतील.

**दादाश्री :** हो, म्हणजे चुकीच्या बाजूने येऊन मारून टाकले तो गुन्हा केला. योग्य रस्त्याने येऊन मारले असते तरीपण तो गुन्हाच म्हटला गेला असता. हा तर दुप्पट गुन्हा झाला. याला निसर्ग म्हणतो 'बरोबर केले आहे.' आरडाओरडा केला तर व्यर्थ जाईल. पूर्वीचा हिशोब चुकता झाला, पण हे लोकांना समजत नाही ना! संपूर्ण आयुष्य तोडफोड करण्यातच जाते. कोर्ट आणि वकील... त्यात कधी उशीर झाला तर वकील पण शिव्या देतो, 'तुम्हाला अक्कल नाही, गाढव आहात...' हे असेही ऐकावे लागते! त्यापेक्षा दादाश्रींनी सांगितलेला निसर्गाचा न्याय समजून घेतला तर समाधान होईल ना! कोर्टात जायला हरकत नाही कोर्टात जा, पण त्याच्यासोबत बसून चहा प्या. अशा प्रकारे व्यवहार करा. (समाधानपूर्वक प्रश्न सोडवा). जर त्याला पटले नाही, तर त्याला सांगा की, आमचा चहा प्या. अशा प्रकारे सर्व व्यवहार करा (समाधानपूर्वक प्रश्न सोडवा). जर त्याला हे पटले नाही, तर त्याला

सांगा की, आमचा चहा पी, पण तू जवळ बैस. कोर्टात जायला हरकत नाही पण प्रेमपूर्वक प्रश्न सोडवा. (समोरच्या बद्दल राग-द्वेष निर्माण होणार नाहीत अशा प्रकारे.)

**प्रश्नकर्ता :** अशी माणसे तर आपला विश्वासघात पण करतील ना!

**दादाश्री :** मनुष्य काहीही करू शकत नाही. जर तुम्ही प्युअर (निर्दोष) असाल, तर तुम्हाला कोणी काहीच करू शकत नाही. असा या जगाचा कायदा आहे, प्युअर असाल तर कोणी काही करणार नाही. म्हणून स्वतःची चूक सुधारायची असेल तर सुधारावी.

## आग्रह सोडला, तो जिंकला

ह्या जगात तू न्याय शोधायला जातोस? घडले तोच न्याय. 'ह्याने मला थप्पड मारली म्हणून माझ्यावर अन्याय केला', असे नाही. पण जे घडले तोच न्याय. हे जेव्हा समजेल, तेव्हाच ह्या सर्व गोष्टींचे निराकरण होईल.

'जे घडले तोच न्याय' असे जर म्हटले नाही तर बुद्धी उड्या मारू लागेल. अनंत जन्मापासून ही बुद्धी गोंधळ घालत आहे, मतभेद निर्माण करत आहे. खरे तर बोलण्याची वेळच यायला नको. आम्हाला काही बोलण्याची वेळच येत नाही. जो (आग्रह) सोडून देतो, तो जिंकला. तो स्वतःच्या जबाबदारीवर आग्रह धरत असतो. बुद्धी गेली हे कसे कळणार? न्याय शोधायला जाऊ नकोस. जे घडले त्याला न्याय म्हटले, म्हणजे बुद्धी गेली, असे म्हणता येईल. बुद्धी काय करते? सगळीकडे न्याय शोधत राहते, त्यामुळेच हा संसार उभा राहिला आहे. म्हणून न्याय शोधू नका!

न्याय शोधायचा असतो का? जे झाले तेच करेक्ट, लगेच तयार. कारण 'व्यवस्थित' शिवाय काहीच होत नाही. नसता उपद्व्याप!

## महाराणीने नाही, वसुलीराणीने फसवले

बुद्धी तर खूपच गडबड गोंधळ करत असते. बुद्धीच सर्व काही बिघडवित असते ना? ही बुद्धी म्हणजे काय? जी न्याय शोधते, तिलाच बुद्धी म्हणतात. ती (बुद्धी) म्हणेल 'तुम्ही पैसे का म्हणून देणार नाही, माल तर घेऊन गेलात ना?' हे 'का म्हणून' विचारले, ती बुद्धी. अन्याय केला, तोच न्याय. तुम्ही वसुलीचे प्रयत्न करत राहावे. म्हणावे 'आम्हाला पैशाची खूप गरज आहे, सध्या आम्हाला खूप अडचण आहे.' तरी पण त्याने दिले नाही तर परत यावे. पण 'तो का म्हणून देत नाही?' असे म्हटले तर मग वकील शोधायला जावे लागते. मग तो सत्संग सोडून तेथे जाऊन बसणार. जे घडले तोच न्याय म्हटले, म्हणजे बुद्धी निघून जाते.

आत अशी श्रद्धा ठेवायची की जे घडत आहे, तो न्याय आहे. तरीही व्यवहारात आपल्याला पैशाच्या वसुलीसाठी जावे लागते. पण तेव्हा ह्या श्रद्धेमुळे आपली बुद्धी बिघडणार नाही. समोरच्यावर राग येणार नाही आणि आपला मनस्तापही होणार नाही. जसे नाटक करतो ना, तसे जाऊन तिथे बसावे. आणि म्हणावे 'मी तर चार वेळा येऊन गेलो पण आपली भेट झाली नाही. ह्या वेळेला मात्र तुमची पुण्याई म्हणा किंवा माझी पुण्याई, पण आपली भेट झाली.' अशी गंमत करत करत उधारी वसुली करावी. बाकी, 'तुम्ही मजेत आहात ना? मी तर मात्र सध्या मोठ्या संकटात सापडलो आहे.' तेव्हा तो विचारेल, 'तुम्हाला काय अडचण आहे?' तेव्हा सांगावे 'माझी अडचण तर मलाच माहीत. तुमच्याजवळ पैसे नसले तर कोणाकडून तरी मला आणून द्या.' अशा तऱ्हेच्या गोष्टी करून काम काढून घ्यावे. लोक तर अहंकारी आहेत, म्हणून आपले काम होईल. अहंकारी नसते तर काहीच चालले नसते. अहंकारी माणसाच्या अहंकाराला जरा चढवले तर तो सर्व काही करतो. 'पाच-दहा हजार मागवून द्या'. असे म्हटले तर 'हो, मागवून देतो' असे तो म्हणेल. अर्थात भांडण व्हायला नको.

राग-द्वेष व्हायला नको. शंभर खेपा मारल्या आणि तरीही पैसे दिले नाहीत, तर हरकत नाही. 'जे घडले तोच न्याय' असे समजून घ्यावे. निरंतर न्यायच होत आहे! तुमच्या एकट्याची उधारी वसुली होत नाही, असे थोडेच आहे?

**प्रश्नकर्ता :** नाही, नाही. सर्व व्यापाऱ्यांचे असेच असते!

**दादाश्री :** जगात कोणीही महाराणीमुळे फसले गेले नाही, वसुलीमुळे फसले गेले आहेत. बरेच लोक मला येऊन सांगतात की, 'माझी दहा लाखाची उधारी परत मिळत नाही.' पूर्वी जेव्हा वसुली मिळत होती, पैसे कमावीत होते, तर कोणी मला सांगायला येत नव्हते. आता सांगायला येतात! वसुली शब्द ऐकला आहे का तुम्ही?

**प्रश्नकर्ता :** कोणी आपल्याला अपशब्द बोलतो, ती देखील वसुलीच आहे ना?

**दादाश्री :** हो, ती पण वसुलीच आहे ना! एखादा आपल्याला लागट बोलतो. कुठल्याही डिक्शनरीत (शब्दकोशात) नसतील असे शब्द सुनावतो. मग आपण डिक्शनरी उघडून शोधतो की हा शब्द कुठून आला? तर त्यात तो शब्द नसतोच, असे माथेफिरु असतात! पण ते त्यांच्या जबाबदारीवर बोलत असतात ना! त्यात आपली जबाबदारी नाही ना! तेवढे चांगले आहे.

तुमचे पैसे परत केले नाही, तो सुद्धा न्याय आहे, परत केले, तो देखील न्याय आहे. हा सगळा हिशोब मी बऱ्याच वर्षांपूर्वी काढून ठेवलेला आहे. पैसे परत दिले नाही, यात कुणाचाही दोष नाही. त्याचप्रमाणे कोणी पैसे परत करायला आला, तर त्यात त्याचे उपकार कसले?! ह्या जगाचे संचालन वेगळ्याच प्रकारे आहे!

## व्यवहारात दुःखाचे मूळ

न्याय शोधून शोधून तर दम निघून गेला आहे. माणसाच्या मनात

असे विचार येतात की मी याचे काय बिघडविले आहे, की तो माझे बिघडवित आहे?

**प्रश्नकर्ता :** हो असे वाटते, आपण तर कुणाचे नावही घेत नाही, तरी पण लोक आपल्याला फटके का मारतात?

**दादाश्री :** हो, म्हणूनच तर हे कोर्ट, वकील ह्या सर्वांचे व्यवसाय चालतात. असे झाले नसते तर कोर्ट कसे चालेल? मग तर वकीलांना कोणी अशीलच मिळाले नसते! परंतु वकीलही किती पुण्यवान, की अशील सकाळी लवकर उठून येतात आणि वकीलसाहेब तेव्हा दाढी करीत असले, तर तो थोडा वेळ बसून राहतो. साहेबाला घर बसल्या पैसे द्यायला येतो. साहेब किती पुण्यवान आहेत, पाहा! वकीलाकडून तो नोटिस लिहून घेतो आणि पन्नास रुपये देतो. म्हणजे न्याय शोधू नका, तर सर्व सुरळीत पार पडेल. तुम्ही न्याय शोधता हीच भानगड आहे.

**प्रश्नकर्ता :** पण दादा, आता अशी वेळ आली आहे की आपण ज्याचे चांगले करायला जातो, तोच आपल्याला दंडुका मारतो.

**दादाश्री :** त्याचे चांगले केले तरी तो दंडुका मारतो, याचेच नाव न्याय! पण हे त्याच्यासमोर बोलायचे नाही. समोर बोलले तर त्याच्या मनात असे येईल की हे तर फार निर्लज्ज झाले आहेत.

**प्रश्नकर्ता :** आपण एखाद्याबरोबर अगदी सरळ वागत असलो, तरी तो आपल्याला काठी मारतो.

**दादाश्री :** काठी मारतो, तेच न्याय! शांतपणे जगूही देत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** सदरा घातला, तर म्हणेल 'सदरा का घातला?' टीशर्ट घातला, तर म्हणेल, 'टीशर्ट का घातले?' तो काढून टाकला तर मग म्हणेल, 'का काढला?'

**दादाश्री :** ह्यालाच तर आपण न्याय म्हणतो ना! आणि त्यात

न्याय शोधायला गेलो, त्याचाच तर मार पडतोय. तेव्हा न्याय शोधू नका. हे असे आम्ही अगदी साधे आणि सरळ संशोधन केले आहे. न्याय शोधला म्हणून तर ही सर्व मारामार आणि शेवटी घडायचे तेच घडते. तर मग आधीच आपण शहाणे झालो तर? ही तर फक्त अहंकारची ढवळाढवळ आहे.

घडले तेच न्याय! म्हणून न्याय शोधायला जाऊ नका. जर तुझे वडील म्हणाले 'तू असा आहेस, नी तसा आहेस.' तर जे घडले, तोच न्याय आहे. त्यांच्याशी असा वाद घालू नकोस की तुम्ही हे असे का बरे बोललात? ही गोष्ट अनुभवाची आहे, आणि नाहीतरी शेवटी थकून भागूनही न्याय तर स्वीकारावाच लागतो ना! स्वीकार करतात की नाही लोक? लाख प्रयत्न केले तरी वस्तुस्थिती बदलत नाही. तेच जर स्वखुशीने स्वीकारले असते तर काय वाईट? हो, त्यांना सांगायची गरज नाही, नाहीतर ते परत उलट्या रस्त्याने चालतील. मनात मात्र समजून जायचे की जे घडेल तोच न्याय.

आता बुद्धी वापरू नका, जे घडत आहे, त्यालाच न्याय म्हणा. हा तर म्हणेल, 'तुम्हाला कोणी सांगितले होते जाऊन गरम पाणी ठेवायला?' अरे! जे घडले तोच न्याय. हा न्याय समजल्यावर, 'आता मी तक्रार करणार नाही,' असे म्हणेल. हो की नाही?

कोणी उपाशी असेल, त्याला आपण जेवायला बसवले, आणि नंतर तो जर असे म्हणाला की 'तुम्हाला कोणी सांगितले होते जेवू घालायला? विनाकारण आम्हाला त्रास दिला, आमचा वेळ वाया घालवला! असे म्हणाला, तर आपण काय करावे? त्याच्याशी वाद घालावा? हे 'जे घडले तोच न्याय' आहे.

घरातील दोघांपैकी एकाने बुद्धी चालवणे बंद केले तर सर्व सुरळीत होऊन जाईल. पण तो त्याची बुद्धी चालवित असेल तर काय होईल? मग रात्री जेवणही गोड वाटणार नाही.

पाऊस पडत नाही, हा न्याय आहे. तेव्हा शेतकरी काय म्हणेल? परमेश्वर अन्याय करीत आहे. तो त्याच्या गैरसमजुतीमुळे असे बोलतो. त्याच्या अशा म्हणण्याने काय पाऊस पडणार आहे? पाऊस पडत नाही, हाच न्याय. जर नेहमी पाऊस पडत नाही, हाच न्याय आहे. जर नेहमी पाऊस पडत राहिला, दरवर्षी पावसाळा चांगला जात असेल, तर पावसाचे काय नुकसान होणार होते? एका ठिकाणी ढग गडगडून भरपूर पाऊस पाडतो तर दुसरीकडे दुष्काळ! निसर्गाने सर्व 'व्यवस्थित' केले आहे. तुम्हाला वाटते ना निसर्गाची व्यवस्था चांगली आहे? निसर्ग नेहमी न्यायच करतो.

म्हणजे ह्या सर्व सिद्धांतिक गोष्टी आहेत. बुद्धी घालविण्यासाठी हा एकच कायदा आहे. जे घडले तोच न्याय, असे मानले तर बुद्धी निघून जाणार. बुद्धी कुठपर्यंत जिवंत राहते? जे काही घडत आहे त्यात न्याय शोधायला जाल, तोपर्यंत बुद्धी जिवंत राहते, मग तर बुद्धी पण समजून जाते. बुद्धीलाही लाज वाटते, की जळलं, आता तर हा मालकच असा बोलत आहे, तर आपण येथून निघून गेलेलेच बरे.

## नका शोधू न्याय ह्यात

**प्रश्नकर्ता :** बुद्धी काढूनच टाकायची आहे, कारण की ती खूप मार खायला लावते.

**दादाश्री :** बुद्धीला काढायची असेल, तर बुद्धी काही अशीच जात नाही. बुद्धी हे 'कार्य' आहे, जर आपण त्याचे कारण काढून टाकले तर हे 'कार्य' नाहीसे होईल. त्याची कारणे काय? वास्तवात जे घडले, त्याला न्याय म्हटले की ती निघून जाईल. जग काय म्हणते? वास्तवात जे घडले, त्याचा स्वीकार करावा. आणि न्याय शोधत राहिलात तर भांडण-तंटे चालूच राहतील.

तात्पर्य, बुद्धी अशी सहजासहजी जाणार नाही. बुद्धी जाण्याचा

मार्ग कोणता? तर त्याच्या कारणांचे सेवन केले गेले नाही तर बुद्धी निघून जाईल, मग ते 'कार्य' होणार नाही.

**प्रश्नकर्ता :** आपण म्हणालात की बुद्धी हे 'कार्य' आहे आणि त्याची कारणे शोधलीत, तर ते कार्य बंद होऊन जाईल.

**दादाश्री :** त्याच्या कारणात तर आपण न्याय शोधायला निघालो हेच त्याचे कारण आहे. न्याय शोधायचे बंद करून टाकले तर बुद्धी निघून जाणार! न्याय कशासाठी शोधता? सून म्हणते 'पण तू माझ्या सासूला ओळखत नाहीस, मी आले तेव्हापासून ती मला त्रास देत आहे. ह्यात माझा काय गुन्हा?'

ओळख असल्याशिवाय कोणी दुःख देईल का? सासूचा हिशोब वहीखात्यावर जमा असेल, म्हणून ती तुला सारखी दुःख देत राहील. तेव्हा सून म्हणते 'मी तर त्यांचे तोंडही पाहिले नव्हते.' 'अरे, पण तू ह्या जन्मी पाहिले नसेल, परंतु मागच्या जन्मीचा हिशोब काय म्हणतो?' म्हणून जे होत आहे तोच न्याय'!

घरी मुलगा दादागिरी करतो ना? तो दादागिरी करतो, तोच न्याय. हे तर बुद्धी असे दाखवते की मुलगा असून वडीलांच्या समोर दादागिरी? जे घडले, तोच न्याय.

हे 'अक्रम विज्ञान' काय सांगते? पाहा हा न्याय! लोक मला विचारतात, 'दादाजी आपण बुद्धी कशाप्रकारे घालवली? तर आम्ही न्याय शोधत राहिलो नाही, म्हणून बुद्धी निघून गेली. बुद्धी आपल्या सोबत कुठपर्यंत राहू शकते? तर न्याय शोधतो, आणि न्यायाला आधार देतो तोपर्यंत बुद्धी राहणार, आणि तेव्हा बुद्धी म्हणेल, 'हा भाऊ तर आपल्याच पक्षात आहे.' आणि असेही म्हणेल की 'मी इतका चांगल्या तऱ्हेने नोकरी केली, तरीही डायरेक्टरर्स का असे उलटच बोलतात?' अशाप्रकारे तुम्ही बुद्धीला आधार देता? अरे, न्याय का शोधता?

डायरेक्टरर्स जे बोलतात, तेच खरे आहे. आतापर्यंत ते का बोलत नव्हते? कोणत्या आधाराने बोलत नव्हते? आता कोणत्या न्यायाच्या आधाराने बोलत आहेत? विचार केल्यावर सहज समजेल की ते जे बोलले, ते सप्रमाण आहे? अरे, ते पगार वाढवून देत नाहीत, हाच न्याय आहे. आपण त्याला अन्याय कसे म्हणू शकतो?

## बुद्धी शोधते न्याय

हे तर सारे ओढवून घेतलेले दु:ख आहे आणि थोडेफार जे दु:ख आहे ते बुद्धीमुळे आहे. प्रत्येकात बुद्धी असतेच ना? ती विकसित बुद्धी दु:ख देते. नाही तेथून दु:ख शोधून आणते. माझी तर बुद्धी पूर्ण विकसित झाल्यानंतर निघून गेली. बुद्धीच नाहीशी झाली! बोला, मग मजा येणार की नाही येणार? अगदी एक परसेन्ट पण बुद्धी राहिली नाही. तेव्हा एका माणसाने मला विचारले, 'बुद्धी कशी काय नाहीशी झाली? तू निघून जा, तू निघून जा, असे म्हटल्याने?' मी म्हणालो 'नाही, भाऊ, असे नाही करता येत' बुद्धीमुळे तर आतापर्यंत आपला रुबाब राहिला. दुविधेत असताना, ऐन वेळेला, 'काय करावे, काय करू नये?' याचे सगळे मार्गदर्शन केले. तिला काढून टाकायची असते का? मग मी पुढे म्हणलो, 'जो न्याय शोधतो ना, त्याच्याजवळ बुद्धी कायमची राहते.' 'जे घडले तोच न्याय' असे म्हणणाऱ्याची बुद्धी निघून जाते. न्याय शोधायला गेलो, ती बुद्धी!

**प्रश्नकर्ता :** पण दादा, मग जीवनात जे काही येईल ते स्वीकारुन घ्यायचे का?

**दादाश्री :** मार खाऊन स्वीकारण्यापेक्षा आनंदाने स्वीकारलेले चांगले.

**प्रश्नकर्ता :** संसार आहे, मुले आहेत, मुलांच्या बायका आहेत, हे आहे, ते आहे. म्हणून संबंध तर ठेवावे लागतात.

**दादाश्री :** हो, सगळे ठेवायचे.

**प्रश्नकर्ता :** मग त्यात मार पडला तर काय करावे?

**दादाश्री :** सगळे संबंध ठेवून जर मार पडला तर तो आपण स्वीकारुन घ्यावा. नाहीतरी मार पडला तर आपण काय करू शकतो? दुसरा काही उपाय आहे का?

**प्रश्नकर्ता :** काही नाही. वकीलाकडे जावे लागेल.

**दादाश्री :** होय, दुसरे काय होऊ शकणार? वकील रक्षा करेल की तो त्याची फी घेईल?

## 'घडले तोच न्याय', तेथे बुद्धी 'आऊट'

न्याय शोधायला लागला म्हणून बुद्धी उभी रहाते. बुद्धी जाणते की, आता माझ्यावाचून याचे चालणार नाही आणि जर आपण म्हणालो की घडले तोच न्याय आहे, तेव्हा बुद्धी म्हणते, 'आता या घरी आपला रुबाब चालणार नाही', ती मग निरोप घेते आणि निघून जाते. आणि जो कोणी तिचा समर्थक असेल, तिथे घुसते. तिच्याबद्दल आसक्ती ठेवणारे खूप लोक असतात ना! नवस करतात, माझी बुद्धी वाढो, असा! आणि तेवढ्याच प्रमाणात समोरच्या पारड्यात मनस्ताप वाढत जातो. बॅलेन्स (समतोल) तर पाहिजे ना, नेहमी? त्याच्या समोरच्या पारड्यात बॅलेन्स असायलाच पाहिजे. आमची बुद्धी संपली म्हणून मनस्ताप-दुःख हेही संपले.

## विकल्पांचा अंत, हाच मोक्षमार्ग

अत: जे घडले त्याला न्याय म्हणत असाल तर निर्विकल्प व्हाल. आणि लोक तर निर्विकल्प होण्यासाठी न्याय शोधायला निघाले आहेत. विकल्पाचा शेवट येतो, तोच मोक्षमार्ग! विकल्प निर्माण होणार नाहीत, असा आहे ना आपला मार्ग?

आपल्या अक्रम मार्गात माणूस मेहनत केल्याशिवाय पुढे प्रगती करत राहतो. कारण आपल्या चाव्याच अशा आहेत की मेहनतीशिवायच पुढे प्रगती होत राहते.

आता बुद्धी जेव्हा विकल्प करविते ना, तेव्हा बुद्धीला सांगावे, जे घडले तोच न्याय. बुद्धी न्याय शोधते की माझ्यापेक्षा लहान आहे तरी मर्यादा ठेवत नाही. मर्यादा ठेवली हाही न्याय आणि नाही ठेवली, तोही न्याय. बुद्धी जितकी निर्विवाद होईल तेवढे निर्विकल्पी होता येईल !

हे विज्ञान काय सांगते ? न्याय तर संपूर्ण जग शोधत आहे. त्यापेक्षा आपणच स्वीकारुन घ्या ना, की जे घडले तोच न्याय आहे. म्हणजे मग जज्जही नकोत आणि वकीलही लागणार नाही. नाहीतरी शेवटी मार खाऊन सुद्धा जसे आहे तसेच राहते ना ?

## कोणत्याही कोर्टात न मिळे संतोष

आणि समजा एखादी व्यक्तीला न्याय हवा आहे, म्हणून त्याने खालच्या कोर्टात जाऊन जजमेन्ट करून घेतले. वकील भांडले, मग जजमेन्ट आले, न्याय झाला. तेव्हा तो म्हणतो, नाही, पण ह्या न्यायाने मला संतोष वाटत नाही. न्याय मिळाला तरी संतोष नाही, मग आता काय करायचे ? तर आता वरच्या कोर्टात चला. तेव्हा जिल्हा कोर्टात गेले. तिथल्या जजमेन्ट वर पण संतोष झाला नाही. आता काय करायचे ? तर म्हणेल, नाही आता हायकोर्टात! तेथे पण संतोष झाला नाही, मग सुप्रीम कोर्टात गेले, तेथे सुद्धा संतोष झाला नाही. शेवटी राष्ट्रपतिनां सांगितले. तरी त्यांच्या न्यायानेही संतोष झाला नाही. मार खाऊन मरतो ! न्याय शोधूच नकोस की त्याने मला का शिव्या दिल्या, किंवा अशील माझ्या वकीली फी का देत नाही ? नाही देत, हाच न्याय आहे. नंतर देऊन जातो, तोही न्यायच आहे. तू न्याय शोधू नकोस.

## न्याय : नैसर्गिक आणि विकल्पी

दोन प्रकाराचे न्याय. एक विकल्पांना वाढविणारा न्याय आणि दुसरा विकल्पांना कमी करणारा न्याय. अगदी खरा न्याय विकल्पांना कमी करणारा आहे, की 'घडले तो न्यायच आहे.' आता तू ह्यावर दुसरा दावा मांडू नकोस. तू आता तुझ्या बाकीच्या गोष्टींकडे लक्ष दे. याच्यावर दावा मांडशील, तर तुझ्या दुसऱ्या गोष्टी राहून जातील.

न्याय शोधायला निघाले म्हणजे विकल्प वाढतच जातील, आणि हा नैसर्गिक न्याय विकल्पांना निर्विकल्प बनवित जातो. जे घडले, तोच न्याय आहे. आणि तरीही पाच व्यक्तींचा पंच जो निर्णय घेतो तेही नेमके त्याच्या विरुद्धच जाते. तेव्हा तो त्या न्यायालाही स्वीकारत नाही, म्हणजे तो कोणाचेच ऐकत नाही. त्यामुळे मग विकल्प वाढतच जातात. स्वतःच्या अवतीभवती जाळेच गुंफत राहतो, असा माणूस काहीच प्राप्त करू शकत नाही. विनाकारण अतिशय दुःखी होतो! त्यापेक्षा पहिल्यापासूनच श्रद्धा ठेवावी की 'जे घडून गेले तोच न्याय.'

आणि निसर्ग नेहमी न्यायच करीत असतो, निरंतर न्यायच करीत आहे पण तो पुरावा देऊ शकत नाही. पुरावे 'ज्ञानी' देतात की हा न्याय कशा प्रकारे? कसे हे घडले, हे सर्व 'ज्ञानी' सांगू शकतात. त्याला संतुष्ट करतात, मग द्विधा संपते आणि समाधान मिळते. निर्विकल्पी झालो तर समस्या संपुष्टात येतील.

– **जय सच्चिदानंद**

# दादा भगवान फाउन्डेशनची प्रकाशित मराठी पुस्तकें

1. भोगतो त्याची चूक
2. एडजस्ट एवरीव्हेर
3. जे घडले तोच न्याय
4. संघर्ष टाळा
5. मी कोण आहे ?
6. क्रोध
7. चिंता
8. प्रतिक्रमण (सं)
9. भावना सुधारे जन्मोजन्म
10. कर्माचे विज्ञान
11. पाप-पुण्य
12. आई-वडील आणि मुलांचा व्यवहार (सं)
13. पति-पत्नीचा दिव्य व्यवहार (सं)
14. समजपूर्वक प्राप्त ब्रह्मचर्य (सं)
15. मानव धर्म
16. मृत्युवेळी, आधी आणि नंतर
17. सेवा-परोपकार
18. दान
19. त्रिमंत्र
20. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी
21. चमत्कार
22. सत्य-असत्याचे रहस्य
23. वाणी, व्यवहारात (सं)
24. पैशांचा व्यवहार (सं)
25. क्लेश रहित जीवन
26. निजदोष दर्शनाने... निर्दोष!
27. प्रेम
28. गुरू-शिष्य
29. अहिंसा
30. आप्तवाणी-1, 2, 3
31. जगत कर्ता कोण ?
32. कर्माचा सिद्धांत

# हिन्दी

1. आत्मसाक्षात्कार
2. ज्ञानी पुरुष की पहचान
3. सर्व दु:खों से मुक्ति
4. कर्म का सिद्धांत
5. आत्मबोध
6. मैं कौन हूँ ?
7. पाप-पुण्य
8. भुगते उसी की भूल
9. एडजस्ट एवरीव्हेयर
10. टकराव टालिए
11. हुआ सो न्याय
12. चिंता
13. क्रोध
14. प्रतिक्रमण (सं, ग्रं)
16. दादा भगवान कौन ?
17. पैसों का व्यवहार (सं, ग्रं)
19. अंत:करण का स्वरूप
20. जगत कर्ता कौन ?
21. त्रिमंत्र
22. भावना से सुधरे जन्मोंजन्म
23. चमत्कार
24. प्रेम
25. समझ से प्राप्त ब्रह्मचर्य (सं, पू, उ)
28. दान
29. मानव धर्म
30. सेवा-परोपकार
31. मृत्यु समय, पहले और पश्चात्
32. निजदोष दर्शन से... निर्दोष
33. पति-पत्नी का दिव्य व्यवहार (सं)
34. क्लेश रहित जीवन
35. गुरु-शिष्य
36. अहिंसा
37. सत्य-असत्य के रहस्य
38. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी
39. माता-पिता और बच्चों का व्यवहार (सं)
40. वाणी, व्यवहार में... (सं)
41. कर्म का विज्ञान
42. सहजता
43. आप्तवाणी - 1 से 9
52. आप्तवाणी - 13 (पूर्वार्ध व उत्तरार्ध)
54. आप्तवाणी - 14 (भाग-1, 2)
56. ज्ञानी पुरुष (भाग-1)

**( सं - संक्षिप्त, ग्रं - ग्रंथ, पू - पूर्वार्ध, उ - उत्तरार्ध )**

**★ दादा भगवान फाउन्डेशन द्वारे गुजराती आणि इंग्रजी भाषेत सुद्धा बरीच पुस्तके प्रकाशित झाली आहे। वेबसाइट www.dadabhagwan.org वर सुद्धा आपण ही सगळी पुस्तके प्राप्त करू शकता।**

**★ प्रत्येक महिन्यात हिन्दी, गुजराती आणि अंग्रेजी भाषेत दादावाणी मेगेझीन प्रकाशित करीत आहे।**

## संपर्क सूत्र

### दादा भगवान परिवार

**अडालज** : **त्रिमंदिर**, सीमंधर सिटी, अहमदाबाद-कलोल हाईवे,
पोस्ट : अडालज, जि.-गांधीनगर, गुजरात - 382421
**फोन :** 9328661166, 9328661177
E-mail : info@dadabhagwan.org

**मुंबई** : **त्रिमंदिर,** ऋषिवन, काजुपाडा, बोरिवली (E)
फोन : 9323528901

| | | | |
|---|---|---|---|
| **दिल्ली** | 9810098564 | **बेंगलूर** | 9590979099 |
| **कोलकता** | 9830080820 | **हैदराबाद** | 9885058771 |
| **चेन्नई** | 7200740000 | **पूणे** | 7218473468 |
| **जयपुर** | 8890357990 | **जलंधर** | 9814063043 |
| **भोपाल** | 6354602399 | **चंडीगढ** | 9780732237 |
| **इन्दौर** | 6354602400 | **कानपुर** | 9452525981 |
| **रायपुर** | 9329644433 | **सांगली** | 9423870798 |
| **पटना** | 7352723132 | **भुवनेश्वर** | 8763073111 |
| **अमरावती** | 9422915064 | **वाराणसी** | 9795228541 |

**U.S.A.** : **DBVI Tel. :** +1 877-505-DADA (3232),
**Email :** info@us.dadabhagwan.org

**U.K.** : +44 330-111-DADA (3232)

**Kenya** : +254 722 722 063

**UAE** : +971 557316937

**Dubai** : +971 501364530

**Australia** : +61 421127947

**New Zealand** : +64 21 0376434

**Singapore** : +65 81129229

**www.dadabhagwan.org**



## जे घडले तोच न्याय

जर तुम्ही निसर्गाचा न्याय समजलात की 'जे घडले तोच न्याय' तर तुम्ही या जगातून मुक्त होऊ शकाल. निसर्गाला जरा सुद्धा अन्यायी मानाल तर मात्र तुम्ही ह्या जगात गुरफटून जाल. निसर्गाला न्यायी मानणे हेच ज्ञान आहे. 'जसे आहे तसे' जाणणे याचे नाव ज्ञान आणि 'जसे आहे तसे' न जाणणे याचे नाव अज्ञान.

'जे घडले तोच न्याय,' हे जाणले तर संपूर्ण संसारातून पार होता येईल असे आहे. जगात एक क्षणाही अन्याय होत नाही, न्यायच होत आहे. पण बुद्धी आपल्याला फसवत असते की ह्याला न्याय कसे बरे म्हणता येईल ? म्हणून आम्ही मूळ गोष्ट सांगू इच्छितो की हा निसर्गाचा न्याय आहे, म्हणून तुम्ही बुद्धिपासून वेगळे होऊन जा. एकदा समजून घेतल्यानंतर बुद्धीचे आपण ऐकायचे नाही. 'जे घडले तोच न्याय.'

- दादाश्री



dadabhagwan.org




Printed in India

Price ₹15